**संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती येथील निवासी ज्ञान स्तोत्र आणि संशोधन केंद्र इमारत बांधकामासाठी निधी वितरीत करण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : पुरक-२०२३/प्र.क्र.१०६/विशि-२**

मंत्रालय विस्तार भवन,मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- १५ मार्च, २०२४.

**संदर्भ** :- १) शासन निर्णय क्रमांक : मुमंस-२०१७/प्र.क्र.१०१/विशि-२, दि.०३.१०.२०१८.

२) कुलसचिव, संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती यांचे दि.०१.०२.२०२४ रोजीचे पत्र.

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३.

**प्रस्तावना** : संत गाडगेबाबा, अमरावती विद्यापीठ, अमरावती येथे अमरावती विद्यापीठाच्या मालकीच्या असलेल्या जागेवर निवासी ज्ञान स्तोत्र आणि संशोधन केंद्र इमारत बांधकामाच्या रु.४९९.७३ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भिय क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर बांधकामाकरीता आतापर्यत एकूण रु.४७८.८५ लक्ष एवढा निधी वितरीत करण्यात आला आहे. सदरहू इमारतीचे बांधकाम तातडीने करण्याकरीता व विद्यार्थ्यांसाठी तात्काळ वापरात आणण्याच्या दृष्टिने विद्यापीठ निधीतून सदरहू इमारत पूर्ण करण्यात आली आहे. आता उर्वरित निधी वितरीत करण्याची विद्यापीठाने संदर्भिय क्रमांक (२) येथील पत्रान्वये विनंती केली आहे. वित्त विभागाने सदर कामासाठी निधी वितरीत करण्यास मान्यता दिल्यानुसार, उर्वरित निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** संत गाडगेबाबा, अमरावती विद्यापीठ, अमरावती येथे अमरावती विद्यापीठाच्या मालकीच्या असलेल्या जागेवर निवासी ज्ञान स्तोत्र आणि संशोधन केंद्र इमारत बांधकामाकरीता रु.२०,८८,०००/- (अक्षरी रुपये वीस लक्ष अठ्ठ्याऐंशी हजार फक्त) इतकी तरतूद खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

## २. अटी व शर्ती

१. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, मुंबई, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता संबंधीत विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

२. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी अनुदान मंजुर करण्यात आले आहे त्याच त्याच उद्दिष्टासाठी वापर करावा.

३. वितरीत करण्यात आलेल्या निधीचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) तसेच विद्यापीठाने केलेल्या बांधकामाची सद्य:स्थिती संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास तात्काळ सादर करण्यात यावीत.

४. वरील अटींचे पालन करण्याची जबाबदारी कुलगुरु, संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती यांची राहील.

३. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२ प्रधानशिर्ष २२०२, सर्वसाधारण शिक्षण ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०२, विद्यापीठांना सहाय्य, - (००) (१२) अमरावती विद्यापीठाचा विकास (अनिवार्य) (२२०२ ३४७७), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) "या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२०२४ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३२३/२०२४/व्यय-५, दि.११.०३.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३१५२१५१२०१८०८ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHARAD SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=be7c6620763057633615219 44ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2024.03.15 22:01:39 +05'30'

**( शरद कोकाटे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) कुलगुरु, संत गाडगेबाबा, अमरावती विद्यापीठ, अमरावती.
३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर.
५) महालेखापाल, (लेखापरीक्षण) - २ महाराष्ट्र, नागपूर.
६) कुलसचिव, संत गाडगेबाबा, अमरावती विद्यापीठ, अमरावती.
७) सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
८) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती / पुणे / नागपूर.
९) वित्त विभाग, (व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.

१०) मा.प्रधान सचिव, (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

११) मा.उप सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१२) उप सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१३) अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४)निवडनस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.